वैध मापन शास्त्र यंत्रणेतील उप नियंत्रक गट-ब या संवर्गातून सह नियंत्रक, गट - अ या संवर्गात पदोन्नती / पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्र. बदली- २०२१ / प्र.क्र. ३०/ ग्रासं-३**
मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०६ ऑक्टोंबर, २०२१.

**शासन आदेश -:**

सन २०२०-२०२१ या निवडसूची वर्षात वैध मापन शास्त्र यंत्रणेतील खालील उप नियंत्रक गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी- S-१५- (१३२३००-४१८००) यांना सह नियंत्रक गट -अ (राजपत्रित) ( वेतनश्रेणी S-२०-५६१००-१७७५०० ) पदावर या आदेशाव्दारे विहित अटींच्या अधीनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर उप नियंत्रक यांची पदोन्नतीअंती पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ- ६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. पां. मा. बिरादार | खुला | खुला | उप नियंत्रक, मुंबई जिल्हा.क्र.१ | सह नियंत्रक, नागपूर विभागीय कार्यालय |
| २ | श्री. शि. के. बागल | खुला | खुला | उप नियंत्रक, औरंगाबाद विभागीय कार्यालय | सह नियंत्रक, अमरावती विभागीय कार्यालय |
| ३ | श्री. सु. ह. चाटे | भज-ड | खुला | उप नियंत्रक, मुंबई जिल्हा. क्र.२ | सह नियंत्रक, औरंगाबाद विभागीय कार्यालय |

०२. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानूसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून तसेच पुढील अटींच्या अधीन राहून संबंधित उप नियंत्रक यांना सह नियंत्रक संवर्गात रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती राहील.
२) सदर पदोन्नत्या, उप नियंत्रक या संवर्गाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण सद्य:स्थितीत प्रलंबित नाही. तसेच या संवर्गाच्या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या / तदर्थ स्वरुपात देण्यात येत आहेत.
३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी पदोन्नत अधिका-यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.
४) सदर सह नियंत्रक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीचे आदेश हे मा. सर्वोच्च न्यायालयातील प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्र. २५१८१ / २०१८ च्या अधीन राहतील.

५) सदर तात्पुरत्या पदोन्नत्या या राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहतील.

६) सदर तात्पुरत्या पदोन्नत्या या दिव्यांग कर्मचा-यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१ व इतर याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दि. २९/६/२०२१, दि. ०८/०७/२०२१ व दि. २२/७/२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

७) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरुपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणा-या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

८) संबंधित उप नियंत्रक यांना सह नियंत्रक पदावर दिलेली तात्पुरती पदोन्नती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

९) संबंधित उप नियंत्रक यांनी सह नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१५ / प्र.क्र. ३०३ / का. १२, दि. १२.०९.२०१६ व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१८ / प्र.क्र.१५९ / का.१२, दि. ०१.०८.२०१९ मधील तरतूदीनूसार संबंधित अधिका-याचे नाव सन २०२०-२०२१ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि, पुढील दोन वर्षी (सन २०२१-२२ व २०२२-२३ ) होणा-या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिस-या वर्षाच्या निवडसूचीत (सन २०२३-२४ ) सह नियंत्रक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

१०) सदर अधिका-यांची सह नियंत्रक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिका-यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

११) पदोन्नत अधिका-यांनी या आदेशाच्या दिनांकापासून तीस दिवसांमध्ये सह नियंत्रक या पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

१२) संबंधित उप नियंत्रक यांनी पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांच्या कार्यमुक्तीचे आदेशनुसार तात्काळ रुजू व्हावे व आपला रुजू अहवाल नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना तसेच शासनास त्वरीत सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००६१५३६१८२७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR

Digitally signed by CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD, CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, pseudonym=6D15FCA69F88876EC2B759F13E27834408B4EDD6, serialNumber=2B0496C0C213A3F50C6522CC39AE5DE95E1150AC3287E89C21B1422E313820A2, cn=CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
Date: 2021.10.06 15:37:22 +05'30'

**(चारुशीला तांबेकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित अधिकारी, वैध मापन शास्त्र (नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचेमार्फत)

**प्रत,**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

४) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद / अमरावती / नागपूर

५) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा. राज्य मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई